<u>कोषागारातून रोख देय रक्कम</u>

**शासनाकडे जमा करण्यात आलेली महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या कर्मचा-यांची भविष्य निर्वाह निधीची ठेव रक्कम काढण्याबाबत**

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः मजीप्रा-२०१५/प्र.क्र.१३९ /पापु-२३

मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२

तारीख: ३१ मार्च, २०१५

<u>वाचा</u>

१) शासन निर्णय नगर विकास विभाग , क्रमांकः बीयुडी-१०८२/४४६/युडी-२८, दिनांक २८ ऑक्टोबर, १९८३ व शासन शुध्दिपत्रक समक्रमांक दिनांक १८ फेब्रुवारी, १९८४

२) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः इएसटी २००६/प्र.क्र.१०८/पापु-२३ दिनांक ८ नोव्हेंबर, २००७ व शुध्दिपत्रक, दिनांक २३ नोव्हेंबर, २००७.

३) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे पत्र क्रमांकः मजीप्रा/वित्त-२/भनिनि ठेव/११०/२०१५, दिनांक १६ मार्च,२०१५

<u>प्रस्तावना</u>

राज्यातील पाणी पुरवठा योजनांची अंमलबजावणी करण्यासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची स्थापना करण्यात आली. सुरुवातीला महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामध्ये कार्यरत असलेले कर्मचारी/ अधिकारी हे शासनाच्या विभागांकडून प्रतिनियुक्तीने पाठविण्यात आले होते. त्यामुळे या कर्मचा-यांना शासकीय कर्मचा-यांप्रमाणेच नियम लागू करण्यात आले. त्यानुसार, संदर्भ क्र.१ येथील दिनांक २८ ऑक्टोबर, १९८३ च्या शासन निर्णय व शासन शुध्दिपत्रक, दिनांक १४ फेब्रुवारी, १९८४ नुसार म.जी.प्रा.च्या कर्मचा-यांकडून जमा होणारी भविष्य निर्वाह निधीची रक्कम मुख्य लेखाशिर्ष " ८३३६, नागरी ठेवी-८०० इतर ठेवी, महाराष्ट्र पाणी पुरवठा व जलनि:सारण मंडळाच्या कर्मचाऱ्यांचा भविष्य निर्वाह निधी (८३३६-००७-४)" अंतर्गत नागरी ठेव या उपलेखाशिर्षाखाली जमा करण्याबाबत आदेश निर्गमित करण्यात आले.

२. सुरुवातीला महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या कर्मचा-यांची / अधिका-यांची भविष्य निर्वाह निधीची रक्कम ही वितरीत करावयाच्या रक्कमेपेक्षा जास्त असल्यामुळे आवश्यक रक्कम वितरीत करण्यात येऊन उर्वरीत रक्कम वरील लेखाशिर्षाखाली जमा करण्यात येत होती. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या स्थापनेला झालेला कालावधी आणि सदयस्थिती विचारात घेता, त्यांच्याकडे कार्यरत असलेले कर्मचारी / अधिकारी मोठया प्रमाणात सेवानिवृत्त होत आहेत. त्यामुळे महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची भविष्य निर्वाह निधीची जमा होणारी रक्कम वितरीत करण्यासाठी अपुरी पडत आहे. यामुळे महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने

त्यांच्याकडे जमा असलेल्या निधीमधून कर्मचा-यांना/अधिकाऱ्यांना भविष्य निर्वाह निधीची रक्कम अदा केली आहे. शासनाकडे जमा असलेली भविष्य निर्वाह निधीची रक्कम काढण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्याची कार्यवाही उपरोक्त संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे.

३. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील कर्मचाऱ्यांच्या भविष्य निर्वाह निधी ठेवीचा महालेखाकार कार्यालयातील लेख्यांशी ताळमेळ घातला असता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या कर्मचाऱ्यांची सन २०१३-२०१४ अखेर भविष्य निर्वाह निधीपोटी रु.२०३,३३,५०,१६७/- इतके दायित्व येते. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून भविष्य निर्वाह निधी खर्चापोटी सन २०१४-२०१५ मध्ये अपेक्षित अंदाजित खर्च रु.१६,००,००,०००/- आहे. या करिता महालेखाकार, महाराष्ट्र-१ यांचे पत्र क्र.Dep./M.H.८३३६/MJP/५८३ दि.४.९.२०१४ अन्वये कळविलेल्या भविष्य निर्वाह निधीच्या ठेव रक्कम पैकी रु.१६,००,००,०००/- (अक्षरी रुपये सोळा कोटी फक्त) इतकी रक्कम काढण्यास परवानगी देण्याची विनंती संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने केली आहे. सन २०१३-१४ च्या अखेरीस महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील कर्मचाऱ्यांच्या भविष्य निर्वाह निधी ठेवीची रुपये २२१,३३,०५,८५७/- इतकी असल्याचे महालेखापाल कार्यालयाने प्रमाणित केलेले आहे. या जमा असलेल्या रकमेपैकी रुपये १६,००,००,०००/- (अक्षरी रुपये सोळा कोटी फक्त) इतकी रक्कम महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला काढण्यास परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या कर्मचारी/ अधिकारी यांच्या भविष् निर्वाह निधी मुख्य लेखाशिर्ष् “८३३६, नागरी ठेवी-८०० इतर ठेवी, महाराष्ट्र पाणी पुरवठा जलनि:सारण मंडळाच्या कर्मचा-यांचा भविष्य निर्वाह निधी (८३३६-००७-४)” या उपलेखाशिर्षामध्ये महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या कर्मचा-यांचा भविष्य निर्वाह निधीची प्राप्त रक्कम व अन्य जमा या स्वतंत्र लेखाशिर्षातंर्गत जमा करण्यात येतो. या जमा रकमेच्या वितरणासाठी आवश्यक असलेली आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्याची कार्यवाही करण्यात आली असून संदर्भाधिन दिनांक ८ नोव्हेंबर, २००७ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरणांच्या कर्मचारी / अधिकारी यांचेकडून जमा करण्यात आलेल्या भविष्य निर्वाह निधीच्या वर्गणीमधून, तसेच वेळोवेळी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून या कर्मचा-यांच्या खात्यामध्ये जमा करण्यात येणा-या रक्कमेमधुन आवश्यक ती रक्कम शासनाच्या मान्यतेने व महालेखापाल कार्यालयाने वार्षिक पडताळणी करुन सादर केलेल्या अहवालाच्या आधारे काढण्यासाठी “आहरण व संवितरण अधिकारी” घोषित करण्यात आले आहे.

२. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या कर्मचारी/अधिकारी यांच्या भविष्य निर्वाह निधी संदर्भात महालेखापाल कार्यालयाकडून दिनांक ४/९/२०१४ रोजी प्राप्त झालेल्या अहवालानुसार सन २०१३-२०१४ या आर्थिक वर्षाच्या अखेरीला भविष्य निर्वाह निधीची ठेव रक्कम रु.२२१,३३,०५,८५७/- इतकी आहे. त्यास अनुसरुन महालेखापाल कार्यालयाने प्रमाणित केलेली सन २०१३-१४ च्या अखेरीस महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून जमा करण्यात आलेल्या रकमेपैकी रुपये १६,००,००,०००/- (अक्षरी रक्कम रुपये सोळा कोटी फक्त) इतका निधी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास काढण्यास परवानगी देण्यात येत आहे.

३. त्यानुसार रुपये १६,००,००,०००/- (अक्षरी रुपये सोळा कोटी फक्त) इतकी रक्कम "८३३६, नागरी ठेवी-८०० इतर ठेवी, महाराष्ट्र पाणी पुरवठा व जलनि:सारण मंडळाच्या कर्मचा-यांचा भविष्य निर्वाह निधी (८३३६-००७-४)" यालेखाशिर्षांतर्गत जमा असलेल्या रकमेमधून महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या सदस्य सचिवांकडे पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहून रोखीने मंजूर करण्यास शासन या आदेशान्वये मान्यता देत आहे:-

१) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने भविष्य निर्वाह निधी जमा व प्रदानाचा दिनांक ३१.०३.२०१५ अखेरच्या ताळमेळासह हिशोब शासनास सादर करावा.

२) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला यापूर्वी प्रदान करण्यात आलेल्या निधीच्या विनियोगाबाबतची माहिती शासनास सादर करावी.

३) मुंबई वित्तीय नियम १९५९ मधील जोडपत्र-२ मधील नियम क्रमांक ३ नुसार महालेखापाल, मुंबई यांच्याकडे त्यांच्या मागणीनुसार महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे लेखे संबंधित कागदपत्रांसह निरीक्षणाकरिता सादर केले पाहिजेत.

४. या आदेशान्वये मंजूर केलेली रक्कम रुपये १६,००,००,०००/- (अक्षरी रुपये सोळा कोटी फक्त)मिळविण्यासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे संचालक, वित्त (श्री. सुधाकर डांगे ) यांचे सहीने तयार केलेले व उप सचिव (श्री. शां.सि.कुदळे) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांनी प्रतिस्वाक्षरीत केलेले देयक अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे सादर करावे. सदरहू रक्कम इसीएस प्रणालीव्दारे महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांच्या खाती जमा करण्यांत यावी.

५. महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई यांनी उक्त रक्कम मुख्य लेखाशिर्ष "८३३६, नागरी ठेवी- ८०० इतर ठेवी, महाराष्ट्र पाणी पुरवठा व जलनि:सारण मंडळाच्या कर्मचा-यांचा भविष्य निर्वाह निधी (८३३६-००७-४) " या लेखाशिर्षाखाली खर्ची दाखवून, सन २०१४-१५ मधील वित्तीय लेख्यात समाविष्ट करावी.

६. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ८४ /२०१५/कोषा प्र.-५, दिनांक ३० मार्च, २०१५ अनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३०१०५७१२६४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MHASKE GAURI RAHUL

Digitally signed by MHASKE GAURI RAHUL
DN: CN = MHASKE GAURI RAHUL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER SUPPLY AND SANITATION,CID - 918027
Date: 2015.03.31 13:51:47 +05'30'

**गौ. रा. म्हस्के**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
२. वित्तीय सल्लागार व मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, नवी मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई,
४. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
६. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
९. कक्ष अधिकारी, कार्यासन क्र.अर्थ-१९,व्यय-३, कोषा-५, वित्त् विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. कक्ष अधिकारी, (का.क्र.१४११) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११. अवर सचिव, कार्यासन क्र.पापु ०४, लेखाधिकारी, पापु -२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती पापु-२३, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.